सन २०२३-२४ करिता अर्थसंकल्पिय
तरतूदीतून निधीचे वितरण
<u>राजीव गांधी विज्ञान व तंत्रज्ञान आयोग</u>

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन (माहिती तंत्रज्ञान) विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : मातंसं-२०२३/प्र.क्र.२८/का.३९**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २२ मार्च, २०२४

**वाचा :-** राजीव गांधी विज्ञान व तंत्रज्ञान आयोग यांचे पत्र क्र. निधीवि-२०२३/प्र.क्र.५/ रागांवितंआ,दि. ०५/०२/२०२४

**शासन निर्णय :-**

राज्यातील विविध सामाजिक प्रश्नांमध्ये समाजाच्या हितासाठी विज्ञान व तंत्रज्ञानाचा अवलंब करणे, त्याचा प्रसार करणे आणि त्यास चालना देणे या उद्देशाने सन २००४ च्या महाराष्ट्र अधिनियम क्रमांक १५ अन्वये राजीव गांधी विज्ञान व तंत्रज्ञान आयोगाची स्थापना करण्यात आली आहे. उपरोक्त अधिनियमातील नियम क्रमांक १४ अनुसार राजीव गांधी विज्ञान व तंत्रज्ञान आयोगाकरिता शासनाच्या एकत्रित निधीतून अनुदानाच्या स्वरुपात प्रत्येक आर्थिक वर्षामध्ये निधी अदा करण्यात येतो.

**०२.** राजीव गांधी विज्ञान व तंत्रज्ञान आयोगासाठी सन २०२३-२४ या वित्तीय वर्षासाठी रु. ९४ कोटी इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला असून, त्यापैकी रु. ९२ कोटी इतका निधी ३६- सहायक अनुदाने (वेतनेत्तर) व रु.०२ कोटी इतका निधी ३६- सहायक अनुदाने (वेतन) या तपशिलवार लेखाशिर्षाखाली मंजूर करण्यात आला आहे. त्यानुसार शासन निर्णय दि. ०८.०९.२०२३ अन्वये राजीव गांधी विज्ञान व तंत्रज्ञान आयोगास चालू आर्थिक वर्ष २०२३-२४ च्या पहिल्या तिमाहीकरीता २०% म्हणजेच रु. १८,४०,००,०००/- निधी वितरीत करण्यात आलेला आहे.

सद्यस्थितीत राजीव गांधी विज्ञान व तंत्रज्ञान आयोग यांनी सन २०२३-२४ या आर्थिक वर्षामध्ये दुसऱ्या तिमाहीसाठी २०% (रु. १८,४०,००,०००/-) निधी वितरीत करण्याबाबत शासनास विनंती केलेली असून, यापूर्वी आर्थिक वर्ष २०२३-२४ च्या पहिल्या तिमाहीकरिता वितरीत २०% म्हणजेच रु.१८,४०,००,०००/- निधीच्या खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे सादर केलेली आहेत. तद्नूषंगाने, नियोजन व वित्त विभागास १०० टक्के निधी वितरित व खर्च करण्यास मंजूरी देण्याची विनंती करण्यात आलेली होती. त्यानुसार नियोजन व वित्त विभागाने सदर खर्चास मंजूरी दिलेली असून, बिम्स प्रणालीवर निधी वितरित केलेला आहे.

**०३.** सबब, राजीव गांधी विज्ञान तंत्रज्ञान आयोगास सन २०२३-२४ या आर्थिक वर्षामध्ये सूधारित अंदाजाच्या मर्यादेत दुसऱ्या तिमाहीसाठी २०% म्हणजेच रु.१८,४०,००,०००/- इतका निधी वितरीत निधी वितरीत करण्यात येत आहे. कक्ष अधिकारी, विज्ञान व तंत्रज्ञान कक्ष यांनी रु. १८,४०,००,०००/-(रुपये अठरा कोटी चाळीस लाख फक्त) या रकमेचे देयक अधिदान व लेखा कार्यालयाकडे सादर करुन मंजूर करुन घ्यावे व सदर रक्कम सदस्य सचिव, राजीव गांधी विज्ञान व तंत्रज्ञान आयोग यांना सुपूर्द करण्यात यावी.

**०४.** सदर अनुदानाच्या रकमेचा विनियोग सन २००४ च्या महाराष्ट्र अधिनियम क्रमांक १५ मधील नमूद प्रयोजनासाठीच करण्यात यावा तसेच त्यामधून खर्च करताना वित्त विभागाच्या मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. या अनुदानाच्या विनियोगाची तपासणी करुन त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) व कार्यक्रमांचा सविस्तर अहवाल शासनास सादर करावा.

**०५.** वरील खर्च मागणी क्रमांक ए-५, मुख्यलेखाशिर्ष २२५१ सचिवालयीन-सामाजिक सेवा, ०९० सचिवालय, (००)(०३) विज्ञान व तंत्रज्ञान यामध्ये समन्वय व संशोधन (कार्यक्रम) (२२५१ ००४२), ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली टाकण्यात यावा व तो सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**०६.** सदर शासन निर्णय नियोजन विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र.१७०/का.१४४३, दि.०५.०३.२०२४ व वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र.२१५/व्यय-४, दि.११.०३.२०२४ अन्वये सदर खर्चास दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या http://www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३२२११११९४३६७०७ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

AMBADAS SAHEBRAO CHANDANSHIVE

Digitally signed by AMBADAS SAHEBRAO CHANDANSHIVE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=8ec4809bf7e642ce22fdacb42a63ca8410ade167476ac90f3c879facbf715a09, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=462D06A8B0C3DF3A0B3C93FE66F4D8A55913CE3FEBB0F6CDDF9D398D85D7377C, cn=AMBADAS SAHEBRAO CHANDANSHIVE
Date: 2024.03.22 11:50:05 +05'30'

**(अं. सा. चंदनशिवे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई
३) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
४) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
५) सदस्य सचिव, राजीव गांधी विज्ञान व तंत्रज्ञान आयोग, मंत्रालय, मुंबई
६) नियोजन विभाग (कार्यासन १४४३), मंत्रालय, मुंबई
७) वित्त विभाग (व्यय-४), मंत्रालय, मुंबई
८) सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन ३९ (रोखशाखा) तीन प्रती.
९) निवडनस्ती.